**राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत राज्यातील अधिकारी/कर्मचारी यांचे सन २०२४-२५ या वर्षातील प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राप्रधो-२०२५/प्र.क्र.१६/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२५

वाचा-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि. २३.०९.२०११
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. टिसीएम-२०१३/(७१/१३)/प्रशिक्षण, दि. २९.०१.२०१४
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राप्रधो-४२१५/(३८/१५)/प्रशिक्षण, दि. २४.०७.२०१७
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
५) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांचे पत्र क्र. राशैसंप्रपम/साव्यावि/राप्रधो/प्र.प्र/२०२४-२५/००५४९, दि.०३.०२.२०२५.
६) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांचे पत्र क्र. राशैसंप्रपम/साव्यावि/राप्रधो/प्र.प्र/२०२५, दि. २०.०३.२०२५.

प्रस्तावना:-

राज्य प्रशिक्षण धोरण, २०११ अंतर्गत शालेय शिक्षण विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता सन २०२४-२५ वर्षामध्ये राबविण्यात आलेल्या पायाभूत, पदोन्नतीनंतरचे व उजळणी प्रशिक्षण कार्यक्रमास मान्यता देण्याची तसेच त्याकरिता झालेल्या खर्चाच्या अनुषंगाने रु. २७,५०,४००/- तरतूद उपलब्ध करण्याची विनंती संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ६ येथील पत्रान्वये केली आहे. शालेय शिक्षण विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचे प्रशिक्षणासाठी सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षामध्ये रु. १००.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित असून, रु. ७०.०० लक्ष रकमेचे सुधारित अंदाज मंजूर आहेत. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील राज्यस्तर ते तालुकास्तर प्रशिक्षणासाठी प्रशिक्षणाचे दर तसेच प्रशिक्षण स्थळ निश्चित करण्यात आले असून, त्यानूसार सन २०२४-२५ वर्षामध्ये राबविण्यात आलेल्या पायाभूत, पदोन्नतीनंतरचे व उजळणी प्रशिक्षण कार्यक्रमास

मान्यता देण्याची तसेच प्रस्तावित प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत एकूण १९५ प्रशिक्षणार्थ्यांना (पायाभूत/ पदोन्नतीनंतरचे/उजळणी) प्रशिक्षण देण्याच्या अनुषंगाने झालेला खर्च भागविण्यासाठी रु.२७,५०,४००/- तरतूद मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णयः</u>-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत राज्यातील अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता सन २०२४-२५ या वर्षामध्ये राबविलेल्या (पायाभूत/पदोन्नतीनंतरचे/उजळणी) प्रशिक्षण कार्यक्रमास तसेच कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी रु. २७,५०,४००/- (रुपये सत्तावीस लक्ष पन्नास हजार चारशे फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. ई-३, २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा, ००३ प्रशिक्षण, (००) (००) (०१) शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण (कार्यक्रम) २२५१ १००२ या लेखाशीर्षाखालील ५०, इतर खर्च उदिष्टाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

३. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर खर्चाचा अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादींची माहिती शासनास आयुक्त (शिक्षण), पुणे व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पाठवावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४६/२०२५/व्यय-५, दि. २४/०३/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१४५२०६२०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHEETAL BAJIRAO PATIL

Digitally signed by SHEETAL BAJIRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=6adeda15802b25aea33a6c776475fa0e7bf7705ff3cfb01e460cd55351e58270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BDBFE7A78900AD71C27AF6074AFF455E2E529BC5573C2D2CC1BBFC69F0E7579, cn=SHEETAL BAJIRAO PATIL
Date: 2025.03.27 14:52:56 +05'30'

**( शितल पाटील )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. मंत्री ( शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ), मंत्रालय, मुंबई.

७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे

८. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य,पुणे

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर

१०. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१२. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.

१३. अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

१४. निवडनस्ती (प्रशिक्षण)